**विदर्भ व मराठवाड्यातील शेतकऱ्यांनी परवानाधारक सावकारांकडून घेतलेले कर्ज अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- एमएलए-१६२१/प्र.क्र. २०९/७-स**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ३१ मार्च, २०२२

**संदर्भ:-** १) शासन निर्णय क्रमांक एमएलए-१०१५/प्र.क्र. २५/७-स, दि. १०.४.२०१५
२) शासन निर्णय क्रमांक एमएलए-१०१५/प्र.क्र. १७५/७-स, दि. १३.९.२०१९
३) शासन निर्णय क्रमांक एमएलए-१६२१/प्र.क्र. २०९/७-स, दि. २३.११.२०२१
४) वित्त विभाग शासन निर्णय क्र. अर्थसं.२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२८.०१.२२

**प्रस्तावना:-**

विदर्भ व मराठवाड्यातील शेतकऱ्यांनी परवानाधारक सावकारांकडून घेतलेले कर्ज शासनामार्फत संबंधीत सावकारास अदा करुन शेतकऱ्यांना कर्जमुक्त करण्यास संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयानुसार सावकाराने सावकारी परवान्यात नमूद केलेल्या क्षेत्राच्या बाहेर दिलेले कर्ज या योजनेस अपात्र ठरविण्यात आले होते. त्यानुषंगाने संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ मधील सदर अट रद्द करुन ज्या सावकारांनी कार्यक्षेत्राबाहेर कर्जवाटप केले आहे त्या शेतकऱ्यांची कर्जे माफ करण्यास संदर्भाधीन शासन निर्णय क्र.२ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

जिल्हास्तरीय समितीने विदर्भ व मराठवाडयातील १४ जिल्हयांतील ३७४९ कर्जदार शेतकऱ्यांनी घेतलेली कर्ज रक्कम रु. ९.०४ कोटी कर्जमाफीसाठी पात्र असल्याची शिफारस केली आहे. सदर कर्जाची परतफेड करण्यासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी रु. ५.०० कोटी इतक्या रक्कमेची तरतूद करण्यात आलेली होती. दरम्यान सुधारीत अंदाजान्वये सदर योजनेसाठी रु. ३.७५ कोटी इतका निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. सध्यस्थितीत या योजनेंतर्गत रु. २.५० कोटी संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेले आहेत. उर्वरीत रु. १.२५ कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

विदर्भ व मराठवाड्यातील शेतकऱ्यांनी परवानाधारक सावकारांकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदीमधून सुधारीत

अंदाजाच्या मर्यादेत उर्वरीत रु. १.२५ कोटी इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर तरतूद खर्च करण्यासाठी (V०००४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन) सहकार आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात आले आहे. तसेच लेखाधिकारी अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात आले आहे. सदर निधी आहरण करुन हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच याबाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास पाठवावी

सदर खर्च हा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी या विभागाच्या मागणी क्र. व्ही-२, २४२५, सहकार (००)(०१) परवानाधारक सावकाराकडून शेतकऱ्यांनी घेतलेल्या कर्जाची परतफेड (कार्यक्रम) (दत्तमत) ३३ अर्थसहाय्य (२४२५२४४४) या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

उक्त निधी वितरीत करताना संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ व २ मध्ये नमूद कार्यपद्धतीचा अवलंब करुन त्यानुसार अटी / शर्तीची तंतोतंत पुर्तता झाल्यानंतरच सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था यांनी अनुदानाचे वाटप करावे. तसेच सदर योजनेची काटेकोर अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने त्यांनी योजनेचे संनियंत्रण करावे. सदर निधीमधून वितरीत करण्यात आलेल्या रकमेबाबतचा जिल्हा-निहाय तपशीलवार अहवाल प्रतीमहा शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३१११४२५४४८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shinde Rahul Chandrashekhar

Digitally signed by Shinde Rahul Chandrashekhar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b92cb6c4f872b298eba5b276742f5d2e72d0421076aa9ed40beedc51e27e130, pseudonym=3E6B8AC4E9A06482BA1C780FB3067B0B162FF575, serialNumber=6D85E99C3671CB5DA40A5218962B08B2FAEA34CA2F0BFC7731E9E07ECA33F6DA, cn=Shinde Rahul Chandrashekhar
Date: 2022.03.31 11:45:09 +05'30'

**(राहुल शिंदे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.

२. मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.

३. मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.

४. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव.

५. मा. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग.

६. मा. प्रधान सचिव (सहकार), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग.

७. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

८. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (नागपूर, औरंगाबाद व अमरावती)

९. नागपूर, अमरावती व औरंगाबाद विभागातील सर्व जिल्हा उपनिबंधक, उप/सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था

१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.

११. महालेखापाल (लेखा व परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, अमरावती.

१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, औरंगाबाद.

१५. महालेखापाल (लेखा व परिक्षा) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

१६. संचालक लेखा व कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१७. नागपूर, अमरावती व औरंगाबाद विभागातील सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१८. निवड नस्ती.